महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
४ था माळा, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दुरध्वनी क्र. ०२२-२२०२५१७७ Email- rasik.khadse@nic.in

---

क्र.बीसीसी-२०१३/ प्र.क्र. ३५४/१६-ब दि.१७ फेब्रुवारी, २०२०

प्रति,
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग

विषय : मराठा आरक्षण अधिनियम, २०१४ अनुसार दि. ९.७.२०१४ ते दि.१४.११.२०१४ या कालावधीतील ईएसबीसी आरक्षणांतर्गत शासकीय व निमशासकीय सेवेतील नियुक्त्यांबाबत.

संदर्भ : विभागाचे समक्रमांकाचे दि.१३.२.२०२० चे पत्र.

महोदय/ महोदया,

उपरोक्त विषयाबाबतचे संदर्भाधीन पत्र सोबत जोडले आहे.

२. सदर पत्रासोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार आपल्या कार्यालयाची तसेच अधिपत्त्याखालील कार्यालयांची एकत्रित माहिती हार्ड व सॉफ्ट कॉपीमध्ये (एक्सेल मध्ये archana.tamore@nic.in या ई-मेलवर) दि.२०.२.२०२० पर्यंत सादर करावी. माहिती निरंक असल्यास तसेही कळविण्यात यावे.

सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१७१२२१४४७१०७ असा आहे. हे शासन पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Rasik Ambadas Khadse

Digitally signed by Rasik Ambadas Khadse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fdc00fa9bc45e4f7281973d193127b8989dfa5df6a7a694b005e562ebd5c840e, serialNumber=a47200a14b42f151489f73f3e47c9e8733991629b2302a3831b945146be88a80, cn=Rasik Ambadas Khadse
Date: 2020.02.17 12:25:17 +05'30'

(र. अं. खडसे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
४ था माळा, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दुरध्वनी क्र. ०२२-२२०२५१७७ Email- rasik.khadse@nic.in

६०७/५

क्र.बीसीसी-२०१३/ प्र.क्र. ३५४/१६-ब दि.१३ फेब्रुवारी, २०२०

प्रति,
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग

विषय : मराठा आरक्षण अधिनियम, २०१४ अनुसार दि. ९.७.२०१४ ते दि.१४.११.२०१४ या कालावधीतील ईएसबीसी आरक्षणांतर्गत शासकीय व निमशासकीय सेवेतील नियुक्त्यांबाबत

महोदय/महोदया,

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक आणि सामाजिकदृष्ट्या मागास (ईएसबीसी) प्रवर्गाकरिता (राज्यातील शैक्षणिक संस्थांमधील जागांच्या प्रवेशाचे आणि राज्याच्या नियंत्रणाखालील लोकसेवांमधील नियुक्त्यांचे किंवा पदांचे) आरक्षण अध्यादेश २०१४ **(सन २०१४ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.१३)** मधील कलम ४ (१) नुसार मराठा समाजास सरळसेवेच्या पदभरतीमध्ये १६ टक्के आरक्षण विहित करण्यात आले होते. या अध्यादेशास मा.उच्च न्यायालयाने दि.१४.११.२०१४ रोजी स्थगिती दिली. मा.उच्च न्यायालयाच्या या स्थगिती आदेशास अनुसरून या विभागाच्या दि.२१.२.२०१५ च्या शासन निर्णयान्वये मा. उच्च न्यायालयाच्या आदेशापूर्वी म्हणजेच दिनांक ९.७.२०१४ ते दिनांक १४.११.२०१४ दरम्यान मराठा आरक्षणांतर्गत शासकीय व निमशासकीय सेवेतील नियुक्त्या तसेच शैक्षणिक संस्थांमधील प्रवेश अबाधित राहतील असे आदेश देण्यात आलेले होते. तसेच स्थगितीपूर्वी जाहीरात दिली असल्यास सदरची पदे मा. उच्च न्यायालयाचे अंतिम आदेश होईपर्यंत भरण्यात येऊ नयेत, असेही आदेश निर्गमीत करण्यात आले होते.

२. सदर अध्यादेशाचे अधिनियमात रूपांतर झाल्यानंतर त्यासही मा.उच्च न्यायालयाने दि.७.४.२०१५ रोजी स्थगिती दिली. मा.उच्च न्यायालयाच्या दि.७.४.२०१५ च्या निर्णयानुसार या विभागाच्या दि.२.१२.२०१५ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ९/७/२०१४ ते दिनांक १४/११/२०१४ या दरम्यान ईएसबीसी या प्रवर्गासाठी असलेल्या आरक्षणासह जाहीरात दिली असल्यास अशा पदांवर मा. उच्च न्यायालयाचा अंतिम निर्णय होईपर्यंत खुल्या गुणवत्तेनुसार पात्र उमेदवारांमधून तात्पुरत्या स्वरुपात जास्तीत जास्त ११ महिन्यांच्या कालावधीसाठी किंवा

Issued
14/02/2020

सदर न्यायालयीन प्रकरणाचा अंतिम निर्णय यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरिता तदर्थ स्वरुपात नेमणुका देण्याचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

३. शासनाने त्यानंतर महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १/२०१५ निरसित करुन मराठा आरक्षण अधिनियम, २०१८ पारित केला. सदर अधिनियमास मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आल्यानंतर मा. उच्च न्यायालयाने दि. २७ जून, २०१९ च्या निकालाद्वारे आरक्षण अधिनियम, २०१८ वैध ठरविला आहे. त्यानंतर याचिकाकर्त्यांनी मा.उच्च न्यायालयाच्या दि.२७.६.२०१९ च्या निर्णयाच्या विरोधात मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका दाखल केली आहे.

४. मा.उच्च न्यायालयाच्या दि.२७.६.२०१९ च्या निर्णयाच्या विरोधात मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुमती याचिकेची अंतिम सुनावणी दि.१७ मार्च, २०२० रोजी होणार आहे. त्यासंदर्भात दिनांक ९/७/२०१४ ते दिनांक १४/११/२०१४ या दरम्यान ईएसबीसी प्रवर्गाच्या आरक्षणानुसार करण्यात आलेल्या पदभरतीची त्याचप्रमाणे सन २०१८ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.६२ व सन २०१९ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.७ लागू झाल्यानंतर सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास वर्गाकरिता (एसईबीसी) देण्यात आलेल्या आरक्षणानुसार देण्यात आलेल्या संवर्ग निहाय जाहिराती, पदांची एकूण संख्या, एसईबीसी करिता राखीव पदांची संख्या, एसईबीसीची भरण्यात आलेली पदे इ. माहिती मा.सर्वोच्च न्यायालयास सादर करावयाची आहे.

५. सदर माहिती कृपया सोबत जोडलेल्या विहित नमुन्यात हार्ड व सॉफ्ट कॉपीमध्ये (archana.tamore@nic.in या ई-मेलवर) (खुद्द व अधिपत्याखालील कार्यालयांची एकत्रित माहिती) या विभागास दि.२०.२.२०२० पर्यंत सादर करावी. ज्या विभागांची माहिती दि.२०.२.२०२० पर्यंत प्राप्त न झाल्यास त्या विभागाच्या सचिवांची मा.मुख्य सचिव यांच्यासोबत दि.२८.२.२०२० रोजी बैठक घेण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

५. सदर माहिती कृपया बिनचूक पाठविण्याची दक्षता घ्यावी. चुकीची माहिती मा.सर्वोच्च न्यायालयास सादर झाल्यास त्यास संबंधित विभाग जबाबदार राहिल याचीही कृपया नोंद घ्यावी.

आपला,

(टि.वा.करपते)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

C:\pooja\new maratha reservation\टिप्पणी.docx

## विवरणपत्र-१

विभागाचे नाव :

<table>
<tr><th rowspan="3">अ.क्र.</th><th rowspan="3">कार्यालयाचे नाव</th><th rowspan="3">पदांचे नांव</th><th colspan="6">दि. ९.७.२०१४ ते दि. १४.११.२०१४ या कालावधीत ईएसबीसी आरक्षणासह जाहिरात दिली असल्यास पदसंख्या</th><th rowspan="3">दि. २.१२.२०१५ च्या शासन निर्णयानुसार ईएसबीसीच्या उमेदवाराऐवजी खुल्या प्रवर्गातील नियुक्त्यां देण्यात आलेल्या उमेदवारांची संख्या</th></tr>
<tr><th rowspan="2">जाहिरात दिल्याचा दिनांक</th><th rowspan="2">जाहिरात दिलेली एकूण पदे</th><th rowspan="2">ईएसबीसी करिता पदे</th><th rowspan="2">लेखी/तोंडी परीक्षा झाली असल्यास त्याचा दिनांक</th><th colspan="2">दि. १४.११.२०१४ पूर्वी निवडयादी प्रसिध्द केली असल्यास</th></tr>
<tr><th>ईएसबीसी प्रवर्गा अतंर्गत नियुक्त्या दिलेल्या उमेदवारांची संख्या</th><th>ईएसबीसी प्रवर्गा अतंर्गत नियुक्त्या न दिलेल्या उमेदवारांची संख्या</th></tr>
<tr><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
</table>

विवरणपत्र-२

विभागाचे नाव :

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | पदांचे नांव | दि. १४.११.२०१४ नंतर ईएसबीसी आरक्षणासह जाहिरात दिली असल्यास पदसंख्या | | | | | | दि. २.१२.२०१५ च्या शासन निर्णयानुसार ईएसबीसीच्या उमेदवाराऐवजी खुल्या प्रवर्गातील नियुक्त्यां देण्यात आलेल्या उमेदवारांची संख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | जाहिरात दिल्याचा दिनांक | जाहिरात दिलेली एकूण पदे | ईएसबीसी करिता पदे | लेखी/तोंडी परीक्षा झाली असल्यास त्याचा दिनांक | दि. १४.११.२०१४ नंतर निवडयादी प्रसिध्द केली असल्यास | | |
| | | | | | | | ईएसबीसी प्रवर्गा अतंर्गत नियुक्त्या दिलेल्या उमेदवारांची संख्या | ईएसबीसी प्रवर्गा अतंर्गत नियुक्त्या न दिलेल्या उमेदवारांची संख्या | |
| | | | | | | | | | |
| | | | | | | | | | |
| | | | | | | | | | |
| | | | | | | | | | |

विवरणपत्र-३

विभागाचे नाव

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | संवर्ग | पदांचे नांव | दि.११.७.२०१९ च्या शासन निर्णयानुसार खुल्या प्रवर्गातील उमेदवारांच्या तात्पुरत्या नियुक्त्या रद्द करुन त्याऐवजी नियुक्त्या देण्यात आलेल्या ईएसबीसीच्या उमेदवारांची संख्या |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |

विवरणपत्र-४

विभागाचे नाव :

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | संवर्ग | पदांचे नांव | दि. ४.७.२०१९ च्या शासन निर्णयानुसार एसईबीसी आरक्षणासह केलेली कार्यवाही | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | जाहिरात दिल्याचा दिनांक | जाहिरात दिलेली पदे | एसईबीसी करिता राखीव पदे | लेखी/तोंडी परीक्षा झाली असल्यास त्याचा दिनांक | नियुक्ती दिलेल्या उमेदवारांची संख्या |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |